**राज्यातील अल्पसंख्याक बहुल भागातील**
**विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत**
**<u>दुसरी / तिसरी पाळी सुरू करणे.</u>**
**सन २०१६-१७ करिता अनुदानाचे वाटप.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : औप्रसं-२०१६/प्र.क्र. ७७/का.८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २७ फेब्रुवारी, २०१७.

**<u>वाचा -</u>**

१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग : शासन निर्णय क्रमांक - आयटीआय-००९/(११/०९)/व्यशि-३, दि. २९/८/२००९ व दि.२१/८/२०१०.
२) वित्त विभाग : शासन परिपत्रक क्रमांक - अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०/४/२०१६.
३) अल्पसंख्याक विकास विभाग : शासन परिपत्रक क्रमांक - बीयुडी-२०१५/प्र.क्र.४३ (भाग-१)/ का.७, दि.२०/४/२०१६.
४) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग : शासन निर्णय क्रमांक - बियुडी : १७१६/२०१६/प्र.क्र.७९/ रोस्वरो-२, दि.२०/४/२०१६.
५) अल्पसंख्याक विकास विभाग : शासन निर्णय क्रमांक - औप्रसं-२०१६/प्र.क्र.७७/का.८, दि.३०/४/२०१६.
६) वित्त विभाग : शासन परिपत्रक क्रमांक - अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.८/२/२०१७.

**<u>प्रस्तावना -</u>**

राज्यातील अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांसाठी ४२ अल्पसंख्याक बहुल भागातील विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थामध्ये दुस-या/तिस-या पाळीत २४८ तुकडया त्याचप्रमाणे बृहन्मुंबईतील मांडवी व चांदिवली (पवई) येथे नव्याने सुरू होणा-या २ नवीन शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये २८ तुकडया सुरू करण्यास दि.२९/८/२००९ व दि.२१/८/२०१० च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ च्या परिपत्रकान्वये सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०१६ अखेर) योजनेत्तर व योजनांतर्गत अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ८० % मर्यादेत वितरण करण्याच्या सूचना निर्गमित केल्या आहेत. सन २०१६-१७ चा खर्च भागविण्यासाठी “मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यकम, राज्य योजनांतर्गत योजना, (००) (१६) अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी व तिसरी पाळी सुरू करण्यासाठी सहाय्यक अनुदान, (२२३५ ए ५३४)” या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ करिता रु.१३.०० कोटी इतकी अर्थसंकल्पीत तरतूद आहे. त्याअनुषंगाने या योजनेकरिता सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता रु.१३.०० कोटी इतक्या अर्थसंकल्पित तरतूदीच्या ८० % च्या मर्यादेतम्हणजेच रु.१०.४० कोटी (रुपये दहा कोटी चाळीस लाख फक्त) इतक्या निधीचे या विभागाच्या संदर्भ क्र.५ च्या शासन निर्णयान्वये वितरण करण्यात आले आहे. आता वित्त विभागाच्या संदर्भ क्र.६ च्या परिपत्रकान्वये सन २०१६-१७ या आर्थिक वर्षातील उर्वरित कालावधीकरिता योजनेत्तर खर्चाची मर्यादा ९० % व योजनांतर्गत खर्चाची

८० % इतकी विहित करण्यात आली आहे. मात्र ०१- वेतन, ०२-मजूरी, ०४ निवृत्तीवेतन खर्च, ०६ दुरुस्ती खर्च, २२ शस्त्र व दारुगोळा, ३३ अर्थ सहाय्य, ३६ सहायक अनुदाने (वेतने), ४५ व्याज, ५५ कर्जे व आगाऊ रकमा व ५६ कर्जाची परतफेड यासाठीच्या योजनेतर व योजनांतर्गत तरतूदीच्या उर्वरीत २० % निधी पूर्वीच्या पध्दतीने एकत्रितरित्या वितरीत करण्यात संमती देण्यात आली आहे. त्याअनुषंगाने आता ०१ वेतन व ०६ दूरध्वनी, वीज पाणी व शुल्क या उद्दिष्टांखाली उर्वरीत २० % इतकी रक्कम वितरीत करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय -

अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थ्यांसाठी सुरू करण्यात आलेल्या ४२ विद्यमान शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था तसेच बृहन्मुंबईतील मांडवी व चांदिवली (पवई) येथे नव्याने सुरू होणाऱ्या २ नवीन शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थाकरिता “मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००-इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना, (००) (१६) अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी व तिसरी पाळी सुरू करण्यासाठी सहाय्यक अनुदान, (२२३५ ए ५३४)” या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ करिता अर्थसंकिल्पत रु.१३.०० कोटी पैकी आतापर्यंत रु.१०.४० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. आता उर्वरीत २०% इतकी रक्कम म्हणजेच रु.२,३९१२.६० कोटी (रुपये दोन कोटी एकोणचाळीस लाख बारा हजार साठ फक्त) आता खालीलप्रमाणे उद्दिष्टाखाली वितरीत करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे :-

(रुपये हजारात)

| मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना, (००) (१६) अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी व तिसरी पाळी सुरू करण्यासाठी सहाय्यक अनुदान, (२२३५ ए ५३४)" | सन २०१६-१७ साठी अर्थसंकल्पीय अंदाज पुस्तिकेत दर्शविण्यात आलेले अनुदान | दि. ३० एप्रिल, २०१६ च्या शासन निर्णयान्वये वितरीत केलेले अनुदान | याव्दारे वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|
| ०१ वेतन | ११८०९३ | ९४४७४.४ | २३६१८.६० |
| ०६ दूरध्वनी, वीज पाणी शुल्क | १४७० | ११७६ | २९४ |
| १० कंत्राटी सेवा | १४७० | ११७६ | ० |
| ११ देशातर्गत प्रवास खर्च | ४९० | ३९२ | ० |
| १३ कार्यालयीन खर्च | ११७६ | ९४०.८ | ० |
| १४ भाडेपट्टी व कर | १९६ | १५६.८ | ० |
| २१ पुरवठा व सामुग्री | २५४८ | २०३८.४ | ० |
| २४ पेट्रोल, तेल व वंगण | ३९२ | ३१३.६ | ० |
| २६ जाहिरात व प्रसिध्दी | ४९ | ३९.२ | ० |
| २७ लहान बांधकामे | ९८० | ७८४ | ० |
| २८ व्यावसायिक सेवा | १७१५ | १३७२ | ० |
| ३४ शिष्यवृत्या / विद्यावेतन | १३७२ | १०९७.६ | ० |
| ५२ यंत्रसामुग्री व साधनसामुग्री | ४९ | ३९.२ | ० |
| एकूण | १३०००० | १०४००० | २३९१२.६० |

२. कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे संदर्भ क्र.४ अन्वये सन २०१६-१७ पासूनचा निधी वितरीत करण्याकरिता नवीन नियंत्रक अधिकारी, संचालक (प्रशिक्षण), (२२३०) झेए-१०००४ असा सुधारित करण्यात आला आहे. सदर तरतूद संचालक, (प्रशिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते "नियंत्रक अधिकारी" आणि त्यांनी प्राधिकृत केलेले दुय्यम अधिकारी "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून काम पाहतील.

३. संचालक, (प्रशिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांनी निधी वितरीत करतांना तसेच तो खर्च करतांना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, प्रशासकीय मान्यता आदेश व वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णय इत्यादी मधील अटी व शर्तीची पूर्तता करण्यात यावी.

४. या योजनेअतंर्गत अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात येऊन त्याचा तपशील वेळोवेळी अल्पसंख्याक विकास विभागास सादर करावा. तसेच सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे व केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र ( Utilization Certificate ) संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी विहीत मुदतीत शासनास आणि महालेखापाल कार्यालयास सादर करावा.

५. सदर शासन निर्णय संदर्भ क्र. ६ येथील वित्त विभागाच्या परिपत्रकातील सूचनेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०२२७११५५२८३२१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Samir Ramesh Salunkhe

Digitally signed by Samir Ramesh Salunkhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Samir Ramesh Salunkhe
Date: 2017.02.27 16:45:51 +05'30'

**( समीर साळुंखे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल, (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
३. प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५. प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था (सर्व), महाराष्ट्र राज्य,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. सर्व संबधित जिल्हा कोषागार अधिकारी, संचालक (प्रशिक्षण), व्य.शि. व प्र. संचालनालय यांचे मार्फत
९. नियोजन विभाग का. १४७५,
१०. वित्त विभाग, व्यय-४/ अर्थ-३ व १४,
११. अवर सचिव (का.७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी, **सदर रक्कम व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या संचालक, (प्रशिक्षण)-(२२३०) झेडए-१, ०००४ वर बी.डी.एस. तात्काळ उपलब्ध करून देण्याची विनंती करण्यात येत आहे.**
१२. निवडनस्ती.